—गेल्या १२ महिन्यांच्या काळांत

देशहितार्थ ज्यांनीं प्राणत्याग केला त्या

**स्वर्गीय श्री महादेवभाई देसाई**

**श्री सत्यमूर्ति**

प्रभृति देशभक्तांस—

शरच्चंद्र गुण्ये

९-८-१९४३.

बरोबर एक वर्षापूर्वी संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी करणारा ठराव अखिल भारतीय काँग्रेस कमिटीनें आपल्या अधिवेशनांत एकमतानें मंजूर केला. ब्रिटिश साम्राज्यशाहीनें हिंदुस्थानांतून आपली सत्ता काढून घ्यावी अशी मागणी केली आणि आपली मागणी मान्य करणें भाग पाडतां यावें म्हणून सामुदायिक सत्याग्रह सुरू करण्याची परवानगी आणि त्याचें नेतृत्त्व महात्मा गांधींना दिलें.

पण हा लढा सुरू करण्याची संधिच महात्माजींना मिळूं शकली नाहीं. ठराव मंजूर झाला त्याच रात्रीं धरपकड झाली आणि बहुतेक सर्व काँग्रेस कार्यकर्त्यांची तुरुंगाकडे रवानगी झाली.

गेल्या १२ महिन्यांत हिंदी राजकारणाचें एक न सुटणारें कोडें होऊन बसलें आहे. या कोड्याचे तीन प्रमुख प्रवर्तक म्हणजे मुस्लिम लीग, हिंदुस्थानांतील ब्रिटिश सरकार आणि काँग्रेस हे होत.

प्रत्येकानें आपापल्या परीनें युक्तिवाद लढवून कोडें सोडविणें आमच्या हातांत नाहीं; दुसऱ्यांच्याच हातांत आहे असें स्पष्ट केलें आहे. पण वादविवाद आणि वस्तुस्थिति यांत कमालीचा फरक असतो.

हा फरक एकाद्या साध्या उदाहरणानें चट्कन् स्पष्ट होतो. इसापनीति, पंचतंत्र, यांसारख्या पुस्तकांतही साध्या गोष्टींतूनच मोठे नीतिपाठ दिले गेले आहेत.

'**भारत ज्योति**' या इंग्रजी साप्ताहिकाच्या संपादकांनीं त्याच जुन्या गोष्टी पुनः एकदां ऐकवल्या आहेत. परंतु साधे नीतिचे पाठ न

देतां आजच्या राजकारणाच्या कोड्याचें स्वरूप त्यांतून त्यांनीं स्पष्ट करून दाखवलें आहे. या कथासंग्रहांतील बहुतेक कथा ' भारत ज्योति ' मधून स्वैरपणें रूपांतरित केलेल्या आहेत. फक्त शेवटच्या दोन माझ्या स्वतःच्या आहेत. परंतु त्या लिहितांनाही आदर्श म्हणून ' भारत ज्योति ' मधील कथाच समोर ठेवल्या होत्या त्यामुळें त्यांतील गुणांचें श्रेय मीं घेऊं शकत नाहीं.

जुन्या पुराण्या कथा पुनः सांगण्यांत ' भारत ज्योति'च्या संपादकांचा हातखंडा आहे. आणि आजच्या राजकारणाला त्या लागूं करण्यांत तर त्यांनीं कमालच केली आहे. त्यांच्या या गुणांमुळेंच ' भारत ज्योति'चे अग्रलेख अतिशय लोकप्रिय आणि लोकमतनिदर्शक झाले आहेत.

दर रविवारीं या कथा वाचतांना इंग्रजीखेरीज इतर भाषेंतील वाचकवर्गाला त्या वाचायला मिळाल्या तर किती छान होईल असा विचार मनांत आल्यावांचून रहात नसे. या पुस्तकांत त्यांपैकीं उत्तमोत्तम अशा कांहीं निवडक कथा वाचकांस सादर करीत आहें. त्या त्यांना निःसंशय आवडतील असा मला विश्वास वाटतो. अनुवाद करून पुस्तक करण्याची परवानगी दिल्याबद्दल ' भारत ज्योति'च्या संपादकांचा मी ऋणी आहें.

—शरच्चंद्र गुण्ये

# आम्हीं आहोंत सात !

इंग्रजी वाङ्मयांत वर्डस्वर्थची कविता फारच उच्च दर्जाची गणली जाते. We are seven या कवितेंत कविनें एका लहान बालिकेशीं झालेला संवाद रंगविला आहे तो फारच बहारदार वठला असून एका खेडवळ मुलीचें चित्र त्यांत फारच सुंदर रंगलें आहे.

कवि म्हणतो " मी एकदां एका खेड्यांत हिंडत असतां तेथें मला एक लहान पोर दिसली. तिच्याबद्दल कुतूहल वाटून मी तिला तिची माहिती विचारली. तुला भाऊ बहिणी किती आहेत ? " असाही प्रश्न केला.

" आम्हीं भाऊबहिणी मिळून सात आहोंत " तिनें उत्तर दिलें.

" होय ? कुठें आहेत तीं सगळीजणं ? "

" दोन गांवाला गेले आहेत आणि दोन बोटींत असून सफर करायला गेले आहेत—एक बहीण नि एक भाऊ तिकडे स्मशानांत आहेत आणि तिथें जवळच आमची झोंपडी आहे. तिथें मी नि माझी आई राहतों. "

• •

हें एकंदर गणित पाहून कवि गोंधळांत पडला. त्यानें विचारलें, " दोन गांवाला गेले आहेत नि दोन सफरीला गेले आहेत आणि तूं इथें आहेस मग तुम्हीं सातजणं कशीं ? "

" नि मघाशींच मी नाहीं कां सांगितलें कीं दोन स्मशानांत आहेत म्हणून ? "

तरी कविराजांचें समाधान होईना, ते म्हणाले " दोन स्मशानांत आहेत म्हणजे ते धरायचे नाहींत; आतां तुम्हीं पांचच नाहीं कां राहिलांत ? "

पण त्या लहान पोरीला हा तोटा, नुकसान, हानि हिशेबांत धरणें जमेना. गणितांतील बेरजा वजाबाक्यांचे प्रचंड घोंटाळे तिला अद्याप अज्ञात होते. मृत्यूचे परिणाम तिला ज्ञात नव्हते. सुजाण म्हणणाऱ्यांच्या छातींत धडकी भरवणारा यमराज तिच्या कल्पना-सृष्टींत अजून उतरला नव्हता.

ती म्हणाली, " त्यांना जिथें नेऊन ठेवलें ती जागा आमच्या घरापासून अगदीं जवळ तर आहे. माझा भाऊ नि बहीण दोघेंही जवळ जवळच झोंपलीं आहेत.

रोज सकाळीं मी तिकडे फिरावयास जातें. तेथें किती सुरेख हिरवळ आहे. "

मृत भाऊबहिणीचे आणि तिचे संबंध तिच्या स्मृतींत अद्याप ताजे होते—कधीं कधीं ती तिथें खायला घेऊन जाई तर कधीं त्यांना गाणें म्हणून दाखवी हेंही सर्व तिनें कविला निवेदन केलें.

त्यांच्या मृत्यूची वार्तासुद्धां तिला कळली नव्हती असें नाहीं. तिला तें ठाऊक होतें. कारण ती म्हणत होती, " पहिल्यांदा जेन वारली; तेव्हां ती आपल्या बिछान्यांत बराच त्रास भोगत पडली होती. शेवटीं ईश्वरानेंच कृपा करून तिला त्या कष्टांतून कायमचें मुक्त केलें. "

त्यानंतर ती आणि तिचा भाऊ जॉन हे दोघे जेनच्या थडग्या-भोंवती खेळत, नाचत, गात, मजा करीत.

पण कांहीं दिवसांनीं हिंवाळा आला आणि जमिनीवर सगळीकडे बर्फ पडलेलें असतांना जॉनची पाळी आली आणि तोही जेनजवळच जाऊन झोंपला.

कविराजांना अजूनही पेंच सुटेना. त्यांनीं शेवटला प्रयत्न करण्याचें ठरवलें. "जर ते दोन ईश्वराकडे गेले तर मग आतां तुम्ही किती बरें उरलांत?" पोरीनें झटकन् उत्तर दिलें, "सात."

जों जों कवि अधिकाधिक वाद घालूं लागला तों तों कोडें अधि-काधिक गुंतत चाललें. आपण सात आहोंत हा हेका कांहीं केल्या ती पोर सोडीना.

वर्डस्वर्थच्या या कवितेंत अकृत्रिम, बालिश मनाचा फार सुंदर आविष्कार झाला आहे. कवि आणि तत्त्वज्ञानी यांना यांत फारच मौज वाटेल; इतकेंच नव्हे तर अशी वृत्ति आढळून आल्यानें त्यांचें चित्त कांहीं काल गुंग होऊन जाईल. पण राजकारणांत "आम्हीं सात आहोंत" ही वृत्ति ओबडधोबड इतकेंच नव्हे तर आत्मघातकी ठरेल.

सध्यांच्या महायुद्धांत ब्रिटिश साम्राज्याला सर्वांत जास्त हानि पोंचली आहे; पण "अजून कांहींच झालें नाहीं आम्हीं सात आहोंत" असें मानणाऱ्या राजनीतिज्ञांचा तेथें तुटवडा पडलेला नाहीं. फार दूर कशाला? मि. चर्चिलच पहाना!

त्या लहान पोरीचा एक भाऊ आणि एक बहीण अशीं दोनच भावंडें मरण पावलीं होती. पण इकडे?

कॅनडा अमेरिकेच्या नेतृत्वाखालीं गेला आहे. ऑस्ट्रेलियाचीही तीच वाट लागत आहे. न्यूझीलंडचें भवितव्य आस्ट्रेलिया-वर अवलंबून.

आणि हिंदुस्थान ? साऱ्या ब्रिटिश साम्राज्याचा आत्मा. ब्रिटनचा गौरव, साम्राज्य, भरभराट, प्रगति यांचा एकुलता एक स्तंभ—तोही आतां घसरत चालला आहे. मग ब्रिटनची त्याला मान्यता असो वा नसो.

मि. चर्चिल हे राजकारणी पुरुष आहेत. मुत्सद्दी आहेत. त्या लहान पोरीपेक्षां दसपटीनें वयातीत आहेत. त्यांनीं तिच्या सारखा बालिशपणा, अज्ञान, आणि चुकीचें गणित आधाराला घेऊन कसें चालेल ? हें त्यांना समजायला पाहिजे. आजही ते जर "आम्हीं आहोंत सात" असें म्हणूं लागले तर इतिहास त्यांना मूर्खांत काढील.

वर्डस्वर्थ त्यांच्यावर कविता लिहिणार नाहीं हे तर निश्चितच.

---

# योजकस्तत्र दुर्लभः

इसापनीति इसापानें सांगितली इतकेंच नव्हे तर ती स्वतः आचरणांतही आणली. त्याचें स्वतःचें आयुष्य म्हणजेच प्रात्यक्षिक नीतिपाठ होता.

इसाप गुलाम होता. त्याला मालकाचें सगळेंच काम करावें लागे. धन्यासाठीं स्वैपाक करण्याचें कामही त्याचेंच होतें.

एके दिवशीं धन्याकडे त्याचे कोणी खास स्नेही भोजनास यावयाचे होते. धन्याने इसापाला हुकूम केला कीं ' जगांत सर्वांत उत्कृष्ट तऱ्हेचें जें मांस असेल त्याचें पक्कान्न कर. '

संध्याकाळीं पाहुणे मंडळी भोजनास आली. इसापानें पक्कान्न वाढलें. सर्व स्वैपाक उत्कृष्ट झाला होता आणि पक्कान्न तर सर्वोत्कृष्ट. निमंत्रितांनीं धन्याची फार फार तारीफ केली.

मालकही खुलले, ते म्हणाले, " मी आज इसापाला मुद्दामच उत्कृष्ट पदार्थाचें पक्कान्न बनवण्यास सांगितलें होतें. होय ना इसाप ?"

" जी, सरकार. "

" हें पक्कान्न कशाचें आहे ? "

" जिभांचें सरकार. फक्त जिभाच या पक्कानांत वापरल्या आहेत."

" कां ? "

" सरकार, जीभ हाच पदार्थ सर्वांत उत्कृष्ट आहे. मनुष्य आपले विचार तिच्याच द्वारें व्यक्त करतो, भाषेची जननी तीच आहे, जिभेच्या उपयोगानें मैत्री संपादन करतां येते, सर्वोत्कृष्ट उपदेश जिव्हेच्याच द्वारें बाहेर पडतो, चांगुलपणाचा प्रसार जगभर जिव्हाच करते, खरें बोलणारी जीभ ही मनुष्याला मिळालेली सर्वोत्कृष्ट देणगी आहे. मग जिभेहून आणखी चांगली वस्तू कोणती बरें ?

इसापाचा धनी आणि निमंत्रित सर्वच या उत्तरानें खूष झाले. इसापानें आपल्या जिभेचा अत्युकृत्ष्ट उपयोग केला होता. खरोखरच जीभ ही सर्वांत चांगली वस्तू यांत काय संशय ?

त्यानंतर थोडा कालावधि गेला. पुनः एका खास मेजवानीच्या प्रसंगीं पक्वान्न करण्याचें काम इसापाकडेच आलें. धन्यानें यावेळीं मात्र निराळीच अट घातली. तो म्हणाला, " इसाप, आज जगांतील सर्वांत वाईट वस्तूचें पक्वान्न कर. समजलास. "

संध्याकाळीं पाहुणे मंडळी भोजनास बसतांच मालकानें इसापाला बोलावणें पाठवलें. आणि तो येतांच त्याला विचारलें, " मीं सकाळीं काय सांगितलें होतें लक्षांत आहे ना ? "

" आहे सरकार "

" मग आज तूं कशाचें पक्वान्न केलें आहेस ? "

" जिभांचें सरकार ! "

" म्हणजे ? आज पुनः जिभा ? तुला मी उत्तम मांस वापर म्हणून सांगितलें तेव्हाही तूं जिभांचेंच पक्वान्न केलें होतेंस. आज तुला वाईट पदार्थ वापर म्हणून सांगितलें तरी तूं जिभाच वापरल्यास. एकाच जिभेनें तूं असें कसें बोलूं शकतोस ? "

" सरकार, आपण तर आपल्या प्रश्नांतच उत्तरही दिलेंत. मीं आज कितीतरी विचार केला तेव्हां मला जिभेसारखी वाईट वस्तूच दिसेना. एकाच जिभेनें दोन तऱ्हेचे शब्द उच्चारावे, खोटें बोलावें, शिवीगाळ करावी; भांडणतंटे माजवावे, क्रोधाविष्ट होऊन दुसऱ्यास वाटेल तसें बोलावें, असें जर होऊं शकतें तर मग तीच वस्तू सर्वांत वाईट नव्हे काय ? "

धन्याला इसापाचें म्हणणें पटलें.

जिव्हा ही वाईटही आहे आणि चांगलीही आहे.

मि. चर्चिल हे बोलण्यांत पटाईत आहेत. ते वादविवाद पटु असून त्यांच्या वाक्‌गंगेचा प्रवाह फार जोरदार आणि प्रभावी आहे.

जिव्हा हें त्यांचें सर्वांत आवडतें आणि खेळवतां येण्यासारखें शस्त्र आणि अस्त्र आहे.

डंकर्कची घटना झाली त्यावेळीं त्यांच्या शब्दांनीं त्या राष्ट्राला विश्वास वाटला. लोकांना त्यांनीं आकृष्ट केलें. सर्व राष्ट्रांतून त्यांचे पाठीराखे त्यांच्या सहाय्यार्थ आणि राष्ट्राच्या मदतीप्रीत्यर्थ धांवून आले. मोठी शक्ति गोळा झाली. राष्ट्रीय सामर्थ्य वाढलें.

ध्वनिक्षिप्त झालेल्या त्यांच्या भाषणांनीं जागतिक चेतना दिली गेली. अमेरिका, त्यांच्या भाषणांवर फिदा झाली.

माघार आणि अपयश यांचीं वर्णनेंही त्यांनीं आपल्या दमदार जिभेनें केल्यामुळें तीं लोकांना आगेकूच आणि विजय यांसारखी वाटत राहिलीं.

डंकर्क नंतर आणखीही पुष्कळ दुर्घटना झाल्या. पण मि. चर्चिल यांच्या भाषणांतला जोर कमी झाला नाहीं. रशियाही दोस्तांना मिळाला.

मि. चर्चिल यांची जीभ खरोखरच एका अमेरिकन पत्र पंडितानें लिहिल्याप्रमाणें दोस्तांकडून लढणाऱ्या २० पलटणींच्या बरोबरीची आहे.

पण !

त्यांच्या जिभेला दुसरीही बाजू आहे. हिंदुस्थान आणि ब्रिटन यांचे संबंध; हिंदुस्थान विषयक त्यांचीं भाषणें काय दर्शवतात ? असत्य, खोटा प्रचार, भ्रामक गैरसमजुती यांची गल्लतच त्यांत असते. हिंदुस्थानाला दिलेलीं पूर्वकालचीं वचनें, लोकशाहीच्या जागतिक पुरस्काराच्या सनदा, किंवा जाहीर करण्यांत येणारे युद्ध हेतु, यांचा त्यांत पत्ताही नसतो.

जीभ जशी चांगली तशीच ती वाईटही आहे. विस्तवावर स्वैंपाक करतां येतो तसेंच त्यानें घरही जाळतां येतें. त्याचा उपयोग कसा केला जातो यावर त्यांचें बरें वाईटपण अवलंबून असतें.

# खोली आणि गोठा

कौरव पांडवांमध्यें नेहमींच चुरस चाले. दुर्योधन आणि धर्मराज युधिष्ठिर यांच्या बुद्धिपरीक्षेसाठीं नेहमींच कसोटी लावली जाई. दुर्योधनाचीं मातापितरें आणि आचार्य द्रोण यांचीं मतेंही नेहमींच विरुद्ध पडत. पण म्हणून या परीक्षाही बंद पडल्या नाहींत, किंवा त्यांचीं मतेंही बदललीं नाहींत. कित्येक परीक्षांतून धर्मराज विजयी म्हणून ठरल्यानंतरही त्या चालूच होत्या.

धृतराष्ट्रानें आणखी एक परीक्षा घेण्याचें ठरविलें. दोघांही युवराजांना बोलावण्यांत आलें. प्रत्येकाला एक एक मोहोर देण्यांत आली. त्यानंतर आचार्य द्रोण म्हणाले, "ह्या मोहोरेचा तुम्हीं दोघेही कसा उपयोग करतां तें आम्हांला पहावयाचें आहे. आज संध्याकाळीं आम्हीं तुमच्या खोल्यांत येऊं त्यावेळीं तुम्हीं आणलेल्या पदार्थांनीं तुमची प्रत्येकाची खोली अगदीं भरलेली असेल नाहीं !"

युवराजांनीं गुरुपदवंदन करून प्रयाण केलें.

संध्याकाळ झाली. राजा धृतराष्ट्र, माता गांधारी, आचार्य द्रोण आणि इतर दरबारी मंडळी युवराजांच्या खोल्यांकडे निघालीं. प्रथम सर्वजण दुर्योधनाच्या खोलीशीं थांबले. दुर्योधन दाराबाहेर उभा होता.

आचार्य बोलले, " हें काय ? तूं असा बाहेर कां उभा आहेस ? सकाळीं ठरल्याप्रमाणें आम्ही तुझी परीक्षा घेण्यासाठींच आलों आहोंत. तूं भरपूर तयारी केली असशील ना !

" अर्थात् " दुर्योधन म्हणाला. " मी तुमचें सांगणें नीट लक्षांत ठेवलें होतें नि म्हणूनच मला आतां बाहेर उभें राहावें लागलें आहे. खोली अगदीं गच्च भरलेली आहे.

पहिल्यांदा मी बाजारांत गेलों आणि निरनिराळ्या वस्तूंचे भाव पाहिले. पण महाग वस्तू फारच थोडी मिळे. तेव्हां कोणती वस्तू खूप मिळेल तें पहाण्यासाठीं बरीच शोधाशोध केली. शेवटीं एक वस्तू मिळाली. आणि मग कोठें खोली भरूं शकली. "

" पाहूं, काय आणलें आहेस तूं तें, दरवाजा उघड तर खरा. "

" छेः दरवाजा उघडायला मुळीं जागाच नाहीं. कारण आंत खोली अगदीं गच्च भरलेली आहे. "

शेवटीं दाराच्या फटींतून सर्वांनीं पाहिलें. खोली अगदीं गच्च भरलेली होती. अगदीं या टोंकापासून त्या टोंकापर्यंत खालपासून वरपर्यंत—गवताच्या पेंढ्यांनीं.

एकंदरींत दुर्योधनानें आपली खोली भरली होती खरी !

सर्वजण युधिष्ठिराच्या खोलीकडे गेले. दुरूनच त्यांना येतांना पाहिल्याबरोबर धर्मराज लगबगीनें सामोरे आले. सर्व गुरुजनांना वंदन करून ते त्यांना आंत घेऊन गेले. तेथें प्रत्येकासाठीं स्वतंत्र आसन ठेवलेलें होतें. त्यांवर त्यांना बसवून ते जवळच नम्रपणानें हात जोडून उभे राहिले.

खोली झाडून पुसून स्वच्छ केलेली होती. मधोमध सर्वांना बसण्यासाठीं आसनें होतीं आणि किंचित् एका बाजूस एक झुंबर होतें.

त्यांत तुपाचा दिवा होता. त्याच्या वाती झुंबरांत सगळीकडे पसरलेल्या होत्या आणि त्यांतून दिव्य प्रकाश सभोंवार पडत होता.

आचार्यांनीं विचारलें, " तुला तर आम्हीं खोलीभर वस्तू घ्यावयास सांगितलें होतें. खोली भरलेली पहावयाला मिळेल अशी आमची अपेक्षा होती. तूं सकाळीं सांगितलेलें विसरलास वाटतें. "

" नाहीं आचार्य, आपल्याला खोली भरलेली हवी होती. खोली भरलेलीच तर आहे. खोलीभर प्रकाश सर्वत्र पसरलेला आहे आणि आपल्यासारख्या पूज्य नि वंदनीय गुरुजनांनीं ती भरलेली आहे " नम्रपणानें धर्मराज उत्तरले.

आचार्य द्रोण स्वयंस्फूर्तीनें एकदम उद्गारले, " राजा, पहा दोन युवराजांमधील फरक. दोघांनाही आपण खोली भरण्याचा एकच आदेश दिला होता, एकानें ती, वस्तूनें, जडपणानें भरली, दुसऱ्यानें प्रकाश आणि आदर यांनीं भरली. दोघांनाही सांगितलेलें काम एकच पण प्रत्येकानें तें आपापल्या मतिप्रमाणें केलें. दोघेही यशस्वी झाले. पण आपापल्या परीनें—आपापल्या अर्थानुरूप. "

हिंदुस्थान सरकार हिंदवासीयांचें बनलेलें असावें अशी गेले कित्येक दिवस मागणी चालू आहे. कार्यकारी मंडळ हिंदवासीयांनींच भरलें पाहिजे असा पुकारा केला जात आहे. सध्यांचें सरकार आपल्या इच्छेनुरूप तें हिंदवासीयांचें बनवीत आहे.

कार्यकारी मंडळांत नवनवीन हिंदवासीयांची भरती केली जात आहे. दुर्योधनासारखेच तेही स्वस्त असलेली आणि वाटेल तेवढी मिळणारी वस्तू खरेदी करीत आहेत. गवत आणून ते खोली भरीत आहेत.

या लोकांत वजनदार, जाडजूड, आणि प्रचंड लोक आहेत ते कोठल्याही कार्यकारी मंडळांत जाऊं शकतील आणि तें भरूं शकतील एवढेंच नव्हे तर भरगच्चही करतील. खोली भरेल. पण घाण आणि अंधार यांनीं ती परिपूर्ण होईल. लंडन आणि दिल्ली या दोन्हीही ठिकाणीं सोन्याच्या बदलींत वाटेल तेवढें गवत मिळूं शकेल. आणि कार्यकारी मंडळें भरून वाहूं लागतील.

पण दिव्याची एकच वात सबंध खोली प्रकाशानें भरूं शकेल.

गवताच्या शेंकडों पेंडया ठेवून खोली भरेल पण मग ती खोली राहाणार नाहीं. तो गोठा होईल.

उलट एकच पुढारी राष्ट्रीय सरकार बनवूं शकेल.

साम्राज्यशाहीच्या २० मिंध्या लोकांनीं येऊन जरी सरकार बनवलें तरी तें नुसतेंच सरकार राहील. राष्ट्रीय सरकार कदापि होणार नाहीं.

# मूर्ख कोंबडी आणि तिचीं पिलें

लिओपोल्ड ॲमेरी, सर ऑर्थर होप आणि मार्क्विस ऑफ लिनलिथगो या सर्वांनीं आपल्या लहानपणीं इसापनीति वाचलीच असेल. पण कदाचित् दहाव्या बाराव्या वर्षी वाचलेल्या या गोष्टी ते विसरले तर नाहींत ना ? ‘ मूर्ख कोंबडी आणि तिचीं पिलें ’ ही पुढें दिलेली गोष्ट आतां वाचल्यानंतर तरी त्यांना खास आठवेल.

एक होती कोंबडी तिचीं पिलें आणि ती, एका लहानशा खुराड्यांत रहात. एके दिवशीं पहांटे बरेंच धुकें पडलें होतें म्हणून ती बराच वेळ खुराड्यांत पडून राहिली होती.

थोड्या वेळानें उजाडलें. उगवत्या सूर्याच्या किरणांच्या प्रभावानें हळूं हळूं धुकें बाजूस सरलें. कोंबडीची भीति जाऊन तीही खुराड्याबाहेर आली. तिच्यामागें तिचीं पिलेंही आलीं. आणि तिच्या भोंवतीं नाचूं बागडूं लागलीं.

दाराआड एक मांजराचें लहानसें पिलूं होतें. तेंही उन्हाची मजा खात जिभल्या चाटीत होतें. कोंबडीचीं पिलें त्यानें कधींच पाहिली नव्हतीं त्यामुळें मोठ्या आश्चर्यानें तें त्यांच्याकडे पाहूं लागलें. त्याच्या नाचण्या बागडण्याची त्याला भारी मौज वाटली.

थोड्या वेळानें कोंबडीचें लक्ष त्या मांजराकडे गेलें.

लगेच तिनें आपल्या सर्व पिलांना जवळ बोलावलें. आणि अगदीं हलक्या आवाजांत सावधगिरीचा इषारा दिला.

" त्या लुच्च्या मांजरापासून दूर रहा हो. तें तुमच्याकडे लक्ष ठेऊन पहात आहे. मांजरांना कोंबडें फार आवडतें. तुम्हीं भर्रकन् आपल्या खुराड्यांत जा बघूं, नाहीं तर तें तुम्हांला पकडून खाईल."

झालें! मांजराच्या मनांत नसलेले विचार त्याच्या मनांत आले. त्यानें कोंबडीचें भाषण ऐकलें आणि त्याच्यांतला दुष्टपणा जागृत झाला. एका क्षणांत तें त्या सर्व पिलांवर तुटून पडलें आणि निमिषार्धांत त्या पिलांचा त्यानें फडशा पाडला. थोडा वेळ त्यांच्या पंखांची फडफड आणि केविलवाणी आरडा ओरड होऊन सर्व शांत झालें.

मांजराचे रक्तलांच्छित पंजे आणि इकडे तिकडे वाऱ्यावर पसरलेलीं पिसें त्या दु:खद घटनेची साक्ष देत होतीं.

वास्तविक मांजराचा कांहीं कार्यक्रम ठरलेला नव्हता; पण मूर्ख कोंबडीनें त्याला कार्यक्रम आंखून दिला.

व्हाइट हॉल, मद्रास सरकार आणि हिंदुस्थान सरकार यांनीं कॉंग्रेसच्या कार्यक्रमाविषयीं उच्च स्वरानें कंठरव केला आहे. अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीनें फक्त एकच प्रस्ताव मंजूर केला. त्यांत कोठलाही कार्यक्रम नव्हता. त्या प्रस्तावाविषयीं बोलतांना महात्मा गांधीजी व्हाइसरॉयला पत्र लिहिणार होते एवढेंच त्यांनीं सूचित केलें होतें.

एवढाच काय तो त्या रात्रींचा कॉंग्रेस कार्यक्रम.

पण दुसऱ्याच दिवशीं सकाळीं हिंदुस्थान सरकारनें कॉंग्रेसचा कार्यक्रम म्हणून नामाभिधान दिलेला कार्यक्रम प्रसिद्ध केला. लिओपोल्ड अॅमेरी यांनीं त्याचाच प्रतिध्वनि इंग्लंडांत काढला आणि अमेरिकेंत ध्वनिक्षिप्त केला. त्या कार्यक्रमांत काय होतें ? "उद्योगधंद्या-कारखान्यांत संप-हरताळ, न्याय-कचेऱ्यांत संप, शाळा-कॉलेजांत हरताळ, वाहतुकीचे आणि इतर रस्ते तोडणें, बंद पाडणें, उध्वस्त करणें, टेलीफोन, टेलीग्राम यांच्या तारा तोडणें, सैन्यावर निरोधन करणें आणि लष्करभरतीच्या ठाण्यांवर विरोध करणें—सगळेंच" असें त्यांचें म्हणणें होतें.

कॉंग्रेसचा ठराव किंवा महात्मा गांधींच्या भाषणांतील त्याचें स्पष्टीकरण यांत या कार्यक्रमाचा कोठें पुसटता उल्लेखही नाहीं. वृत्तपत्रीय बातम्या सोडल्या तरी पोलिस बातमीदारांनींही तेथें टिपणें केलींच होतीं. त्यांच्या शब्दशः वृत्तांतांतही त्याचा उल्लेख नाहीं. शेंकडों ठिकाणांची झडतीही घेतली गेली पण एकाही ठिकाणीं हा कॉंग्रेसचा कार्यक्रम आहे असा पुरावा मिळालेला नाहीं.

दिल्लींतील एका न्यायाधिशानें तर चीफ कमिश्नरचा हुकूम रद्द ठरवला. "कॉंग्रेसनें मंजूर केलेल्या चळवळी" च्या मजकुराला किती जागा वृत्तपत्रांत दिली जावी याबद्दल बंधनें घालणारा तो हुकूम होता. रद्द ठरवण्याचें कारण एवढेंच कीं "अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीनें कोठलीही चळवळ मंजूर केलेली नाहीं" असें त्यांना आढळून आलें.

त्या रात्रीं सर्व कॉंग्रेस कार्यकर्ते निर्धास्तपणें झोंपी गेले होते. त्यांच्या स्वप्नांत व्हाइसरॉयला गांधींनीं लिहिलेलें पत्रच येत होतें. पण सकाळीं उठून पाहतात तों—काय ! त्यांचे पुढारी

पकडले गेलेले. त्यांच्यापुढें कांहींच कार्यक्रम नव्हता. काय करावें हें त्यांना समजेना. ते किंकर्तव्यमूढ झाले होते.

पण सरकारनें आपली बुद्धि चालवली. त्यांनीं एक " कॉंग्रेसचा कार्यक्रम " प्रसिद्ध केला. कांहींनीं तोच उचलला आणि त्याचे भीषण परिणाम पुढें दिसूनही आले.

आतां त्यांबद्दल कॉंग्रेसवर वाटेल तसे दोषारोप करण्यांत येत आहेत. प्रत्येक वेळीं या कार्यक्रमांतील नवीन नवीन गोष्टी कॉंग्रेसवर लादल्या जात आहेत.

यासंबंधी गैरसमजूत प्रसृत करणारे प्रचारमार्गही अवलंबले जात आहेत. त्याचा वाईट परिणामही दिसून येत आहे.

कारण विचार मूर्खपणानें केला तर कोंबडीप्रमाणें तो स्वतःलाच घातक ठरतो.

---

# जबाबदार कोण?

खरा गुन्हेगार कोण हें ओळखणें बहुतेक वेळां कठिणच असतें. गुन्ह्याचें एकंदर स्वरूपच गैर समज उत्पन्न करणारें असतें, निरनिराळ्या मार्गांनीं समजलेली हकीगत एकमेकांशीं जुळत नाहीं आणि साक्षीपुरावा पूर्ण नसतो.

तरीपण निकाल द्यावाच लागतो. वरील सर्व कमतरता लक्षांत घेऊनही एक गोष्ट नक्कीच आवश्यक असते. ती म्हणजे न्यायाधिशानें प्रामाणिकपणें न्याय देणें ही होय. आपण दिलेल्या न्यायाविषयीं जर त्याला प्रामाणिकपणें अन्याय वाटत नसला तर तो न्याय प्रामाणिक म्हटला पाहिजे.

एकदां कापडाच्या तीन व्यापाऱ्यांनीं आपल्या चौथ्या भागीदाराविरुद्ध एक फिर्याद ठोकली. त्याचें म्हणणें खोडून काढणें जवळ जवळ अशक्यच होतें.

एकंदरीनें वरवर पाहतां त्यांचें म्हणणें योग्यच होतें. पण म्हणूनच न्यायाधिशाचें काम फार कठिण होतें.

चौघांचा मिळून कापसाचा धंदा होता. आणि सगळा कापूस त्यांनीं एका मोठ्या गोदामांत भरून ठेवला होता. पण उंदरांनीं त्या

गोदामांत धुमाकूळ मांडला. त्यांचा यथेच्छ समाचार घेतला जावा म्हणून सर्वांनीं मिळून एक मांजर पाळलें.

मांजर म्हणजे चौघांची समायिक मालमत्ता. तेव्हां त्याचे चार पाय प्रत्येकानें एकएक या प्रमाणें वांटून घेतले. मांजर सर्वांचेंच आवडतें असल्यामुळें त्याचे सर्वचजण लाड करीत. आपापल्या वांटणीचा " पाय " शृंगारण्यांत त्यांना मोठी मौज वाटे. ह्या सुंदर सजलेल्या पायांमुळें तें मांजर इतरांचाही कौतुकाचा विषय होऊन बसलें.

एके दिवशीं एक दुर्घटना झाली. त्या मांजराचा एक पाय जखमी झाला. ज्याच्या वांटणीचा तो पाय होता त्यानें लगेच तेथें मलमपट्टी केली. तेलांत कापूस नि फडकें भिजवून तें त्या जखमेवर नीट बांधलें.

पण ह्या तेलांत भिजलेल्या चिंधीनें दुसऱ्या दिवशीं पेट घेतला. पाय भाजूं लागल्यामुळें मांजर ओरडूं विव्हळूं लागलें आणि सैरावैरा इकडे तिकडे पळूं लागलें. त्यामुळें गोदामांत ठेवलेल्या कापसाच्या गठ्ठयांना एकामागून एक आग लागली. सगळे गठ्ठे जळून गेले. भयंकर नुकसानही झालें.

ह्या नुकसानाला जबाबदार कोण ? उरलेल्या ३ ' पाय'वाल्यांच्या मतें तो जखमी पाय ज्याच्या मालकीचा होता तो जबाबदार ठरला. त्यांनीं न्यायालयांत फिर्याद दाखल केली. चौथा भागीदार आरोपी होता. त्याच्याकडून नुकसानभरपाईची मागणी करण्यांत आली.

पण तो जबाबदारी पत्करीना.

न्यायाधिश विचारांत पडला, कोणाच्या बाजूनें निर्णय द्यावा हेंच त्याला कळेना. त्याचा स्वतःचाच निर्णय ठरेना. शेवटीं त्यानें निकाल एक दिवस लांबणीवर टाकला.

निकालाचा दिवस उजाडला. न्यायालयांत चिक्कार गर्दी झाली होती. न्यायाधिश काय निर्णय देतात तिकडे सर्वांचे कान लागले होते. पण त्यांच्या निर्णयानें सर्व लोक चकित झाले. त्यांच्या मतें चौथ्या भागीदाराविरुद्ध फिर्याद केलीच जाऊं शकत नव्हती.

हा निकाल ऐकून तिघेही भागीदार खवळले. त्यांचा राग विकोपास गेला. " जखमी पायाला बांधलेल्या तेलकट चिंधीमुळें आग लागली हें सूर्यप्रकाशाइतकें ढळढळीत सत्य आहे. तो पाय चौथ्या भागीदाराच्या मालकीचा होता. तेव्हां सगळी जबाबदारी त्याचीच यांत शंका कसली ? त्यानें आम्हां सर्वांची नुकसान भरपाई करून दिलीच पाहिजे " असा मुद्दा त्यांनीं पुढें मांडला.

" पण ती एक बाजू झाली " न्यायाधिश उद्गारले.

" एक बाजू? या प्रश्नाला दुसरी बाजू असणेंच अशक्य आहे. ही एक आणि एकच बाजू आहे. "

" नाहीं, नाहीं. त्याला दुसरी बाजू आहे नि तीच जास्त बरोबर आहे. जखमी पायाला बांधलेल्या चिंधीमुळें आग लागली हें खरेंच आहे. पण न्यायदेवतेला हेंही लक्षांत घेणें आवश्यक आहे कीं आग लागली ती तें मांजर इकडून तिकडे सैरावैरा धांवलें म्हणून ! कापसाचे गठ्ठे जळाले ते त्यांवरून उडया मारीत मांजर गेलें म्हणून !! पण तें जेव्हां धांवलें, त्यानें उडया मारल्या तेव्हां ते आपल्या तीन चांगल्या पायांवर चालत होतें. जखमी पाय कापसाच्या गठ्ठयांना लागलासुद्धां नाहीं. तेव्हां या नुकसानाची सर्व जबाबदारी त्याच्या धांवण्या पळण्यावर—तीन चांगल्या पायांवर—म्हणजे पर्यायानें

तुमच्यावर आहे. तेव्हां तुम्हींच चौथ्या भागीदाराचें नुकसान भरून दिलें पाहिजे."

निकाल ऐकून सर्वांनी माना डोलावल्या. न्यायाधिशाच्या न्यायकौशल्याची तारीफ केली आणि बिनतोड तर्कपद्धतीबद्दल त्याला धन्यवाद दिले.

काँग्रेस आणि गांधीजी यांच्यावर गेल्या कांहीं महिन्यांत झालेल्या मोडतोडीची जबाबदारी टाकण्यांत सरकारही वरील तीन भागीदारांसारखीच चूक करीत आहे. एकंदर नुकसान आणि विध्वंस यांबद्दल त्यांना जबाबदार धरण्यांत येत आहे; परंतु जखमी पायावर जबाबदारी टाकण्यासारखेंच हेंही आहे. तेलांत भिजलेल्या चिंधीमुळें आग लागली असें त्यांचें म्हणणें आहे.

परंतु पूर्वग्रहरहित नजरेनें पाहणाऱ्याला असेंच आढळून येईल कीं ही एक बाजू झाली. आतां दुसऱ्या बाजूचें म्हणणें काय याचाही त्याला विचार करावा लागेल, निकाल जाहीर करण्यापूर्वी तो अविवाद्य आणि पूर्वग्रहरहित इतकेंच नव्हे तर बिनतोड असल्याबद्दल त्याला खात्री करून घ्यावी लागेल.

जखमी पाय कुचकामी होता. निरुपयोगी होता. काँग्रेसला स्थानबद्ध करून सरकारनें तिला कुचकामी करून टाकलें होतें. हालचाल करणें तिला अशक्य होतें.

मग तिच्यावर जबाबदारी कशी टाकतां येईल ? ती कशालाच जबाबदार राहूं शकत नाहीं.

स्थानबद्धतेनंतर जें काय घडलें त्याला जबाबदार उरलेले तीन पाय. हे तीन पाय आपल्याला वाटेल तसे वागले म्हणून वरील गोष्टी घडल्या.

सरकारनें आपल्या तीन पायांवर सैरावैरा धांवण्यास सुरवात केली. प्रचार, वटहुकूम आणि दडपशाही यांचा सर्रास प्रयोग करण्यांत आला.

मांजर तीन पायांवर सैरावैरा धांवलें त्यामुळें भयंकर आग लागली. प्रचंड नुकसान झालें. नुकसानाची जबाबदारी अर्थातच तीन पायांवर पडते.

ज्यांना हालचाल करण्याचें स्वातंत्र्य असतें त्यांनाच जबाबदार धरलें जाऊं शकतें. पण कॉंग्रेस पुढारी तर तुरुंगांत स्थानबद्ध आहेत. त्यांना कसें जबाबदार धरतां येईल ? त्यांना स्वातंत्र्य मुळींच नव्हतें.

जखमी पांय हलूंच शकत नव्हता; मग तो आग लावील कसा ? त्याच्यावर आगीची जबाबदारी पडूंच शकत नव्हती.

ज्या ३ चांगल्या पायांनीं हा जखमी पाय इकडून तिकडे हलवला तेच त्याला जबाबदार यांत काय संशय ?

---

# न सुटणारें कोडें

मद्यप्याचें डोकें ताळ्यावर नसतें पण त्याची वादकुशलता मात्र अतिशय तीव्र असते. नि कधींकधीं तर त्या वादांत चूक दाखवणेंही मोठें कठिण होऊन बसतें.

एकदां एकजण "जास्त झोंकून" कुलुपाशीं खुडबुड करीत बसलेला पोलिसाला दिसला. पोलिस त्याच्या मदतीला आला. तेव्हां हे विद्वान् उद्गारले, "छाऽऽन, छाऽऽन, तुम्ही हें घर थोडा वेळ धरून ठेवा, तें फिरण्याचें थांबलें कीं मला किल्ली बरोबर लावतां येईल."

त्याच्या दृष्टीनें सारें घर फिरत होतें. आणि हा मात्र आपल्या जागेवर अगदीं स्थिर होता.

पुरातन कालांतही मद्यप्यांची अवस्था हीच असे. इराणी दंतकथांत एका मद्यप्याची एक सुप्रसिद्ध कथा आहे.

एक पोलिस अधिकारी आपली रात्रींची गश्त घालीत असतांना एका डबक्यांत एक इसम पडलेला त्याला दिसला. त्यानें त्याला ओढून वर काढलें. त्याच्या हातांत एक बाटली होती.

पोलिसानें विचारलें, "तूं काय प्यायला होतास?"

" ह्या बाटलींत होतें तें ऽऽ."

" ह्या बाटलींत ! काय होतें ! "

" मीं प्यालों तें ऽऽऽ "

पोलिसानें तोच प्रश्न पुनः विचारावा आणि मद्यप्यानें तेंच उत्तर पुनः द्यावें असा प्रकार कांहीं वेळ घडला.

तो काय प्यायला होता ? बाटलींत होतें तें !

बाटलींत काय होतें ? तो प्यायला होता तें !

शेवटीं कंटाळून पोलिसानें त्याला हाताला धरून बजावलें ' ऊठ, आतां कुठेंतरी जा. "

" कुठेंतरी ! कसा जाऊं ? "

" ऊठ, नि चालत जा. "

" वाः वाः पोलिसदादा, अहो मला जर उठून चालतां आलें असतें तर मीं एव्हांना केव्हांच घरीं पोंचलों असतों. नाहीं का ? "

मद्यप्याची शुद्ध गेली होती पण वादकौशल्य कायम होतें. वादांतला मुद्दा त्याला चटकन् सांपडत होता. आपण डबक्यांत पडलों आहोंत हें त्याला ठाऊक होतें. आपल्याला उठतां येत नाहीं हेंही त्याला ठाऊक होतें. आपल्याला घरीं जावयाचें आहे याचीही त्याला कल्पना होती. म्हणूनच तो वरील प्रमाणें वाद करूं शकला.

आमचें सरकारही सध्यां त्याच अवस्थेंत आहे. अनियंत्रित राजसत्तेचा त्यांना मद चढला आहे त्यामळें त्यांची शुद्ध गेली आहे पण वादकौशल्य गेलेलें नाहीं. हिंदुस्थानला भ्रम झालेला नसून आपण गरगर फिरत आहों हें त्यांना अजून कळलेलें नाहीं. आपल्याला कुलूप सांपडेपर्यंत घर धरण्यासाठीं ते पोलिसाला सांगत

सांगत आहेत. फिरणारा हिंदुस्थान थांबविण्यासाठीं त्यांनीं वटहुकूम, आणि भारत संरक्षण कायदा यांचा कडक अंमल चालविला आहे. हिंदुस्थान स्थिर होईपर्यंत कुलुपाची किल्ली बरोबर सांपडण्याची त्यांना आशा वाटत आहे.

हिंदुस्थान धरण्याऱ्या ह्या भानगडींत त्यांनीं बरेच उपद्व्याप कळत न कळत केले आहेत. त्यांनीं गांधीजी व इतर कॉंग्रेस कार्यकर्त्यांना पकडून तुरुंगांत ठेवलें आहे.

" कां ? "

" त्यांनीं जें केलें तें करावयाला नको होतें म्हणून. "

" त्यांनीं काय केलें ? "

" ज्यासाठीं त्यांना अटक करण्यांत आलें तें. "

" तें काय ? "

पुनः तींच प्रश्नोत्तरें !

हें न सुटणारें कोडें सोडविण्यासाठीं हिंदुस्थानांतील सर्व पक्षांच्या प्रतिनिधींनीं गांधीजींची मुक्तता करण्याची मागणी केली. डबक्यांत रात्र घालवण्यापेक्षां बाहेर येणें बरें असें सांगणारी ती सूचना होती.

पण सरकारला स्वतःचें कृत्यच शहाणपणाचें वाटतें.

" जर मला उठून चालतां येत असतें तर मी केव्हांच घरीं नसतों कां गेलों? " हें जसें मद्यप्याचें उत्तर; " तसेंच कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना जर मुक्त करावयाचें असतें तर पेंचप्रसंग आम्हीं मागेंच नसता कां सोडविला ! " हें त्यांचें उत्तर आहे.

# वैतरणेच्या पुलावर

फारफार पूर्वीची गोष्ट. त्यावेळीं लहान मुलांचा गोष्टींवर फार विश्वास असे. वडिलांनीं गोष्टी सांगितल्या म्हणजे त्या त्यांना खऱ्या वाटत. वडिलांच्या रागाचीही त्यांना भीति वाटे.

प्रीतम हा गोड नांव असलेला मुलगा होता. परंतु त्याचें वर्तन आणि एकंदर राहणी त्याच्या बरोबर उलटी होती.

एके दिवशीं त्यानें आपल्या बहिणीला—माधुरीला—खूपच चिडवलें आणि त्रास दिला.

मध्यान्हाच्या वेळीं वडील घरीं आले तेव्हां माधुरी एका कोपऱ्यांत रुसून बसलेली त्यांना दिसली.

" काय झालें तुला ? " म्हणून वडिलांनीं दोनतीनदां विचारलें. परंतु ती स्फुंदत असल्यामुळें तिच्या तोंडून नीट उत्तर बाहेर येईना.

प्रीतमनें तिला त्रास तर दिला होताच पण ' बाबांना सांगशील तर पहा ' असा धाकही घातला होता.

शेवटीं वडिलांनीं प्रीतमला बोलावून विचारलें.

' मीं तर कांहींच केलें नाहीं बाबा. '

बाबांनीं वारंवार विचारून पाहिलें तरी खरें काय तें बाहेर येण्याचा संभव दिसेना. तेव्हां बाबांनीं तो विषयच सोडून दिला.

दुपारीं बाबा रोज एक गोष्ट सांगत. त्यावेळीं प्रीतम आणि माधुरी जवळ बसून ती ऐकत. गोष्ट सुरू करण्यापूर्वीच बाबांनीं सकाळीं काय झालें तें विचारलें.

माधुरीनें आपली सर्व तक्रार बाबांना सांगितली; आपली चूक कबूल केली आणि सगळें सत्य निवेदन केलें.

‘ आतां तूं सांग ’ बाबा प्रीतमला म्हणाले.

‘ माधुरी, एक नंबरची खोटारडी आहे ’ असा निर्णय देऊन प्रीतमनें ‘ गोष्ट सांगा, ’ ‘ गोष्ट सांगा ’ असा आग्रह चालवला.

बाबांनीं गोष्ट सुरू केली.

आपल्या गांवाजवळून वैतरणा नदी वाहतेना, तें तुम्हांला ठाऊकच आहे. खूप वर्षांपूर्वी आपल्या गांवांत एक न्यायप्रिय राजा राज्य करीत होता त्याचें अगदीं रामराज्य होतें. खोटें बोललेलें त्याला मुळींच आवडत नसे नि खपतही नसे.

एकदां ईश्वरानें प्रसन्न होऊन त्याला वर मागण्यास सांगितलें.

राजा म्हणाला, “ मला कांहीं नको. ”

तेव्हां ईश्वर म्हणाला, “ मग तुझ्या प्रजेसाठीं कांहीं माग. ”

त्यावर मात्र राजानें एक वर मागून घेतला. तो म्हणाला, “ मीं स्वतः नेहेमीं सत्याचें पालन करतों. माझ्या प्रजेनेंही तसेंच करावें असें मला अहोरात्र वाटत असतें. तेव्हां सत्याची कसोटी मला लावतां येईल अशी काहीं तरी देणगी तूं मला दे. ”

राजाची ही सत्यप्रियता पाहून परमेश्वराला अत्यानंद झाला. तो

म्हणाला, " राजा, तुझ्यासारखा आत्मत्यागी मी आजपर्यंत पाहिला नाहीं. तूं मागितलेली मागणी मीं ताबडतोब पूर्ण करतों.

आजपासून माझा एक दूत तुझ्या गांवाजवळून वहाणाऱ्या वैतरणेच्या पुलावर उभा राहील. त्या पुलाला कितीतरी कमानी आहेत नि त्या चांगल्या भक्कमही आहेत. पण जर एखादा खोटें बोलणारा त्या पुलावरून जाऊं लागला तर माझ्या आज्ञेनें तो देवदूत ९ वी कमान मोडून टाकील आणि खोटें बोलणाऱ्याला न कळतां ती कमान त्याचा पाय लागतांच ढांसळून पडेल. "

गोष्ट संपली आणि मुलें खेळायला गेलीं.

संध्याकाळीं फिरायला जाण्याची वेळ झाली. तेव्हां बाबा निघाले ! माधुरी निघाली ! ! प्रीतमही निघाला ! ! !

पण बाबांचा रोंख होता वैतरणेकडे ! माधुरी मोठ्या आनंदानें टुणूटुणू उड्या मारीत त्यांच्या बरोबर खेळत चालली होती.

पण प्रीतम ?

त्याच्या छातींत धडधडूं लागलें. तरी पण तो रस्ता ओलांडीतच होता. त्याच्या मनांत हजार शंकाकुशंका उठत होत्या. काय होईल काय नाहीं या कल्पनेनें त्याचें मन भारावून गेलें होतें.

सर्वजण वैतरणेजवळ आले. बाबा नि माधुरी भराभर पुलावरून पुढें जाऊं लागले. १२ व्या कमानीपाशीं बांधलेल्या कठड्या-वरून खालीं उतरून पाण्यांत पाय सोडून बसण्याचा त्यांचा परिपाठ होता.

एका मागून एक कमानी मागें पडूं लागल्या.

एक —
दोन — —
तीन — — —
— — —
आठ — — — —
प्रीतम थांबला.
वैतरणेच्या पुलानें रहस्य उघडें केलें !

कांहीं अधिकाऱ्यांनीं गेल्या १२ महिन्यांतील अत्याचारांचे वेळीं शांतता प्रस्थापित करण्यासाठीं जे उपाय अवलंबले त्यांबद्दल तक्रारी नोंदण्यांत आल्या आहेत. ह्या तक्रारी स्पष्टपणें नमूद करण्यांत आलेल्या नाहींत, कारण विरुद्ध पक्षाबद्दल जनतेच्या मनांत अजून दहशत आहे त्यामुळें त्या स्फुंदून स्फुंदूनच सांगितल्या गेल्या आहेत. सरकारनें त्या खोट्या असल्याचें जाहीरही केलें आहे. ह्या अत्याचारांमुळें जे अनिष्ट प्रकार घडले, त्यांची जबाबदारी कोणावर या बाबतींत सरकारनें पुस्तिका काढून कॉंग्रेस व गांधीजी यांचेवर दोषारोपणही केलें आहे. याबाबत एक पूर्वग्रहरहित चौकशी व्हावयास पाहिजे. वैतरणेच्या पुलावरून एकदां फिरावयास गेलें पाहिजे.

माधुरी एका पायावर तयार आहे.

पण प्रीतम ?

त्याला पुलाची नववी कमान ढांसळण्याची तर भीति वाटत नाहीं ना ?

---

# अपराध आणि शिक्षा

राया आपल्या मंत्र्यावर—अप्पाजीवर—नेहमीं खूष असे. त्याची चलाखी, हुशारी, ज्ञान, बुद्धिमत्ता या सर्व गोष्टींविषयीं त्याला मोठा अभिमान वाटे. आणि आपल्या पत्नीजवळ तो नेहमींच तसें मोठ्या गर्वानें बोलून दाखवी.

पण राणीला तें पटत नसे. आपल्या भावाला मंत्रिपदाची वस्त्रें दिलीं जावीं असें तिला वाटे. ही आपली इच्छा पूर्ण करण्यासाठीं ती वारंवार राजाजवळ हट्ट धरी.

रायानें तिला कितीतरी वेळां बजावलें होतें कीं ' त्याची गोष्ट सुद्धां माझ्याजवळ काढूं नकोस. अप्पाजीची बरोबरी तो जन्मांत करूं शकणार नाहीं. कोठें इंद्राचा ऐरावत नि कोठें शामभटाची तट्टाणी. '

तरीपण राणी म्हणे, " माझा भाऊसुद्धां तसाच आहे. त्याच्याजवळ काय कमी आहे ? याला दोन डोळे आहेत तर त्यालाही आहेत ! याचेजवळ जसे दोन कान आहेत तसेच त्याच्याजवळ आहेत ! ! याच्या तोंडांत जीभ आहे तशीच त्याच्याही आहे ! ! ! शिवाय तो राजघराण्यांतील खानदानी पुरुष असून सर्व शास्त्रें पढला आहे. "

" पण तेवढयानें भागत नाहीं, राणीसरकार ! शिक्षण आणि

खानदान यांपेक्षांही चातुर्य आणि वर्तणूक या गोष्टी महत्त्वाच्या आहेत. सर्व संग्राहक बुद्धि आणि आकलनशक्ति व प्रसंगावधान हे गुण मंत्र्याच्या अंगांत आवश्यक असतात. "

त्यावरही राणीचें ठरीव उत्तर येई. " वर्तन तर माझ्या भावाचें आदर्श आहे. आणि बुद्धिमत्ता तर त्याच्या अंगा अंगांत भरलेली आहे. "

" बरें बुवा, कबूल. आतां वाद नको. आपण एकदां दोघांचीही परीक्षा घेऊनच काय तें ठरवूं. " असें म्हणून रायानें वाद तात्पुरता मिटविला.

कांहीं दिवसांनंतर एकदां जनानखान्यांत राया बसला असतांना राणीचा लाडका पुत्र-चार वर्षांचा युवराज-हट्ट धरून बसलेला त्याला आढळला. दुधासाठीं हट्ट धरून त्यानें आक्रोश सुरू केला होता. मुदपाकखान्यांतून दूध आणवीपर्यंत त्याला दम निघत नव्हता. रडून ओरडून त्यानें आकाश पाताळ एक केलें होतें.

राणी त्याची समजूत घालतां घालतां रडकुंडीला आली. शेवटीं राया तिच्या मदतीला आला. पण युवराज आणखीच चिडले. आपली मागणी त्यांनीं जोरानें पुढें मांडली. जिनांची पाकिस्तानाची मागणी किंवा हिटलरची " लेबेन्स्राम " ची मागणीही त्यापुढें फिकी पडली असती.

रायाला थोडा राग आला. त्यानें त्याला आपल्याजवळ घेतलें. त्याचे हात घट्ट धरले आणि विनोदानें नाहक कोपाचा आव आणला.

पण त्यामुळें तर तो अधिकच चिडला. त्यानें राजाच्या छातीवर पाय मारण्यास सुरवात केली आणि हातांनीं तो त्याचें मुख ओरबाडूं लागला.

शेवटीं दूध आणून त्याला दिलें गेलें. तेव्हां कोठें स्वारीचा आक्रोश थांबला. सर्वत्र शांतता झाली.

दुसऱ्या दिवशीं दरबारांत गेल्याबरोबर रायानें याच संधीचा फायदा घेण्याचें ठरवून राणीला खूण केली. अप्पाजीला बाहेर पाठवून प्रथम राणीच्या भावाला बोलावण्यांत आलें.

तो आल्यावर राया म्हणाला, " राजाच्या तोंडांत चपराक मारणाऱ्याला आणि त्याच्या छातीवर लाथ मारणाऱ्याला काय शिक्षा करावी असें तुमचें मत आहे ? या अपराध्यानें राजाचें सांगणें न ऐकतां वरील प्रकारें त्याचा आदेश धुडकावून लावला आहे. "

श्यालकराज ताबडतोब उच्च स्वरानें म्हणाले, " हे सर्व अपराध दंडनीय असून खुद्द राजाविरुद्ध केलेले आहेत. कायद्यांत त्याला जी शिक्षा सांगितली आहे ती अशी कीं राजाचा आदेश न ऐकल्याबद्दल त्याच्या कानांत तापलेल्या शिशाचा रस ओतला जावा, राजावर हल्ला करण्याबद्दल त्याच्या हातांवर डाग दिले जावे, आणि लाथा मारल्याबद्दल पाय तोडून टाकण्यांत यावेत. "

राजानें होकार देऊन त्याला रजा दिली.

नंतर अप्पाजी आला. त्यालाही तोच प्रश्न विचारण्यांत आला. " हा गुन्हा कधीं घडला सरकार ? " अप्पाजीनें नम्रपणानें विचारलें.

" काल " उत्तर.

लगेच अप्पाजीच्या डोक्यांत विचारचक्र सुरू झालें. ' काल जर अशा भयंकर स्वरूपाचा एखादा गुन्हा घडला असता तर आज तो सर्व गांवभर कळला असता. गुन्हेगाराला पकडण्यांत आलें असतें.

एकंदरींत सगळीकडे खळबळ माजली असती. पण तसें तर कांहींच झालेलें दिसत नाहीं. त्याअर्थी हा कांहींतरी राणीवशांतला प्रकार असावा ! हें सर्व तर्कानें जाणून अप्पाजी उद्गारला, " सरकार, ज्या हातांनीं आपल्यावर हल्ला केला त्यांत सुंदर रत्नांचीं कंकणें घालावींत; आणि ज्या पायांनीं लाथा मारल्या त्यांत सोन्याचे तोडे घालावेत हीच अत्यंत योग्य शिक्षा आहे. "

उत्तर ऐकून रायाला अत्यंत आनंद झाला. तो राणीला म्हणाला, " वरील सर्व अपराध काल तुझ्या मुलानें केलेले आहेत. त्याला तुझ्या भावानें दिलेली शिक्षा योग्य कीं अप्पाजीनें दिलेली हें तूंच ठरव आणि सांग. "

राणीला आपली चूक उमगून आली.

सध्यांच्या ब्रिटिश सरकारला अप्पाजीसारख्या मंत्र्यांची अत्यंत आवश्यकता आहे. योग्य सल्ला देणाऱ्या मंत्र्यांचा आज त्यांचेजवळ तुटवडा आहे.

राजकीय उद्वेगामुळें कांहीं दिवसांपूर्वीं संतापजनक, प्रक्षोभकारक प्रकार घडलेले त्यांना दिसले. आपण काय करीत आहों हें न समजतां पुष्कळ लोकांनीं—रयतेनें—सरकारच्या लेंकरांनीं—विध्वंसक प्रकार केले. त्यांना कांहींतरी हवें आहे. तें त्यांना मिळालें नाहीं म्हणून त्यांनीं आक्रोश मांडला; लहान सहान अत्याचार केले. या अत्याचारांनीं त्यांचें साध्य त्यांना मिळणार नाहीं हें खरेंच. त्यांनीं केलेले सर्व अपराध राजसत्तेविरुद्ध आहेत हेंही मान्य.

राजावर हल्ला करणें आणि त्याच्या छातीवर लाथ मारणें हे अपराध दंडनीय आहेत यांतही शंका नाहीं. पण अप्पाजीनें जसें

त्यांच्या संदर्भाकडे पाहिलें तसें पाहणें आवश्यक आहे. त्याच्या भोंवतींची परिस्थिति, पार्श्वभूमिका तीही अभ्यासली पाहिजे.

याचा अर्थ विध्वंसकांना बक्षीस द्यावें असा नाहीं. तसें करणें चूक ठरेल. परंतु राजा आणि प्रजा यांचे संबंध कसे असावेत याचें निदर्शन या गोष्टींत होत आहे. प्रजा जर लेंकरासारखी असेल तर तिचा प्रामाणिक हट्ट काय आहे हें राजानें पाहिलें पाहिजे आणि तो जर योग्य असेल तर तो पुरवला पाहिजे. आपला हट्ट पूर्ण होत नाहीं असें आढळून आलें, त्याबाबत निराशा झाली तर मूल काय किंवा, प्रजा काय आक्रोश करणार हें साहजिक आहे.

त्याची प्रामाणिक तक्रार दूर करणें ही परमावश्यक गोष्ट आहे. शिक्षा देतांना राजा आणि प्रजा यांचे संबंध काय आहेत, कसे आहेत तेंही पाहिलें पाहिजे. केवळ कायदा, त्यांतील कलमें आणि वटहुकूम, यांचा उपयोग करण्यानें भागणार नाहीं.

# डुकराची चलाखी

डुकराचें मांस खायला गोड लागतें खरें. पण त्यानें बुद्धि कांहीं फारशी तीव्र होत नाहीं. कारण डुकराच्या बुद्धिविषयीं फारशी तारीफ कोणी ऐकलेली नाहीं.

तरीपण त्याच्याही चलाखीविषयीं एक दंतकथा प्रचलित आहेच. आणि त्या एकाच गोष्टीनें डुकराचें नाक आजही वर होऊं शकेल.

एक डुक्कर आणि एक कुत्रा या दोघांना एकाच ठिकाणीं ठेवण्यांत आलें होतें. एकाच बशींतून त्यांना खायला घालण्यांत येई. परंतु त्यांची विश्रांतिची सोय मात्र कांहींच करण्यांत आली नव्हती.

एक लहानसें खुराडें होतें. त्यांत कुत्रा निजे. बिचारें डुक्कर मात्र इकडून तिकडे उन्हा पावसांत, थंडीवाऱ्यांत हिंडे.

पण चुकून जर एखाद्या दिवशीं डुकराला आंत जाऊन बसायला मिळालें तर भटकण्याची पाळी कुत्र्यावर येई.

एकदां मोठें वादळ झालें. मुसळधार पाऊस पडूं लागला. गार वारें अंगाला झोंबू लागलें. सबंध रात्र भटकत घालवण्याची कल्पना येतांच डुकराच्या अंगावर कांटा उभा राहिला. तें धांवत खुराड्याकडे गेलें.

पण कुत्रा अगोदरच तेथें जाऊन आरामशीर पहुडला होता. डुकरानें बरेंच डोकें खाजवलें.

आणि एक शक्कल शोधून काढली. धांवत जाऊन त्यानें खाण्याची बशी आणली. नंतर खुराड्याच्या तोंडाशींच ती ठेवून कुत्र्याकडे पाठ करून तें बशींत तोंड घालून खुडबुड करूं लागलें. मधून मधून मिटक्या मारण्याचाही त्यानें उपक्रम चालवला.

ह्या खुडबुडीनें कुत्रा जागा झाला. प्रथम भास असेल असें वाटून त्यानें तिकडे दुर्लक्ष केलें—

पण छे: आवाज तर खास तोच. आपली खाण्याची बशीच ही. डुक्कर काय बरें खात असेल. भरभर खात आहे. सगळें संपणार तर नाहीं ना ! छे: उठलेंच पाहिजे—असा विचार करून त्यानें खुराड्या बाहेर पडून एकदम बशीवर झडप घातली.

डुकराची युक्ति सफल झाली ! तें मुकाट्यानें येऊन खुराड्यांत स्वस्थ झोंपलें.

इकडे कुत्र्यानें मारे खडखड केली पण बशी रिकामीच होती. तेव्हां त्याला काय मिळणार ? थोड्या वेळानें डुकराचा डाव त्याच्या लक्षांत आला आणि तो परत फिरला. पण आतां हेंही गेलें आणि तेंही अशी त्याची स्थिति झाली.

त्याला सबंध रात्र पावसांत, भिजत कुडकुडत काढावी लागली.

सध्यां हिंदुस्थानांत असाच कांहीं प्रकार चालू आहे. राष्ट्रीय वृत्ति भलत्या मार्गास नेण्याचा प्रयत्न केला जात आहे. देशाबाहेर भयंकर वादळ सुरू आहे, मुसळधार पर्जन्यवृष्टि होत

आहे. कुत्रा सुखानें आपल्या खुराड्यांत निजला आहे पण डुकरानें खुडबुड करून त्याचें लक्ष वेधण्याचा उद्योग आरंभला आहे.

दिल्लीहून पुढील बातमी प्रसिद्ध करण्यांत आली. " राष्ट्रीय युद्ध आघाडीमार्फत ' नवीन हिंदी रचना संघ ' सुरू करण्यांत आला असून त्याचें कार्य युद्धोत्तर कालांतील " हिंदुस्थानला कोणत्या प्रकारचा आंतर्राष्ट्रीय संघ हवा ? " " युद्धोत्तर कालांत आर्थिक साध्य आणि धोरण कसें असावें " वगैरे प्रश्नांबाबत जनतेमध्यें उत्सुकता निर्माण करण्याचें राहील. "

ह्या संदेशांतच त्यांची किंमत केवळ तात्विक चर्चा आहे हें उघड केलें आहे. परंतु ह्याबाबत जी कांहीं चर्चा खरोखर होईल तीमुळें मुख्य प्रश्नापासून लोकांचें अवधान कांहीं काळ तरी दूर खेंचलें जाईल हें खास.

ही युक्ति डोक्याची खरीच. उद्यांच्या योजनांबाबत चर्चा करतांना आजच्या प्रश्नाचा विसर पडणें साहजिक आहे.

हिंदुस्थानाला आंतर्राष्ट्रीय संघांत फार महत्त्वाची जागा आहे, नाहीं का ! त्या संघाविषयीं त्याला फार उत्साह आहे, नाहीं का ! हा आंतर्राष्ट्रीय संघ म्हणजे जगांतली सर्वांत मोठी अधिकारी आणि सत्ता असलेली संस्था; नाहीं कां ! आणि तेथें हिंदुस्थानच्या म्हणण्याप्रमाणेंच तर सगळें चालतें; नाही का ! मग त्या आंतर्राष्ट्रीय संघाच्या भावी उन्नतिकडे हिंदुस्थानानें लक्ष द्यावयाचें नाहीं तर मग कुणी ?

शेतांतल्या बैलांचें कृषक धोरणावर जितकें स्वामित्त्व असतें तितकेंच हिंदवासीयांचें हिंदी आर्थिक धोरणावर आहे. मग

युद्धोत्तर कालांतील आपलें आर्थिक धोरण कसें असावें याचा विचार त्यांनीं आतां करावयाचा नाहीं तर मग केव्हां ?

ती टिनपाटाची बशी हेतुपुरस्सर चाटली जात आहे. ही खुडबुड बुद्ध्या ऐकवली जात आहे.

पण आतां मात्र कुत्रा सावध आहे. रिकामी थाळी आणि भरलेली बशी यांच्यांतला फरक त्याला आतां ओळखूं येऊं लागला आहे.

डुकराच्या काव्याला फशी पडून रात्रभर; थंडीवारा पावसांत भिजत काढण्यापेक्षां उपाशीपोटीं आपल्या खुराड्यांत झोंपणेंच शहाणपणाचें असा त्याला अनुभवानें धडा दिला आहे.

# प्राप्तीचा अर्धा वांटा

दलाल ही एक चमत्कारिक व्यक्ति आहे. उत्पादन, वाहतूक, अदलाबदल यांपैकीं कशांतही ती हातभार लावीत नाहीं.

पण सत्ता किंवा सामाजिक परिस्थिति अथवा आर्थिक किंवा व्यापारी घडामोडीच्या सूत्रांची रचनाही अशी कांहीं चमत्कारिक असते कीं दलालाची जागा मोठी महत्त्वाची होऊन बसते. केवळ ह्या जागेचा फायदा घेऊन तो आपला कांहींही उपयोग, अधिकार किंवा हिस्सा नसतांना नफ्यांत वांटा मागतो.

अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टींतील देवडीवरच्या पहारेकऱ्याची गोष्ट अशीच आहे. त्यानेंही आपल्या जागेच्या बळावर नफा मिळविण्याचा प्रयत्न केला; पुढें त्याला परिणाम मात्र फारच गंभीर भोगावा लागला हें निराळें.

बगदादमधील एका प्रख्यात सरदाराच्या घरीं मोठी मेजवानी होती. खान्याचे तऱ्हतऱ्हेचे चविष्ट, स्वादिष्ट आणि मसालेदार पदार्थ तयार करण्यांत आले होते. उत्तमोत्तम फळें, मांस, आणि धान्यांचा भरपूर उपयोग करण्यांत आला होता. सुंदर, रंगीबेरंगी मद्यचषकांत मदिरा फसफसून चमकत होती. मग इतर पेयांची काय कथा ?

पण एक उणीव होती.

ती म्हणजे मासे.

त्या सरदारानें सर्व प्रकारचे प्रयत्न करून पाहिले; पाण्यासारखा पैसा ओतण्याची तयारी दाखविली; धाक दिला; आर्जवें केलीं पण त्या दिवशीं तुफान वादळांत जाऊन मासे आणण्यास कोणींही कोळी तयार झाला नाहीं.

इकडे मेजवानीची सर्व तयारी झाली. पण सरदाराला चुटपुट लागून राहिली. माशाशिवाय जेवण म्हणजे बेचव !

पण तेवढ्यांत खुदानें खैर केली. एक कोळी दारांत आला. त्याच्या पाटींत ३।४ च पण चांगले मोठे आणि चवदार मासे होते.

कोळी वाड्याच्या दाराशीं आला खरा पण देवडीवाल्यानें त्याला दारांतच अडवलें. " मी तुला आंत जाऊं देणार नाहीं. " कोळ्यानें बरीच मनधरणी केली. दाढीला हात लावला पण देवडीवरील माणूस दरवाजा सोडीना. त्याची एक अट होती. ती म्हणजे कोळ्याला त्या माशांबद्दल जें कांहीं मिळेल त्याचा अर्धा हिस्सा त्यानें देवडीवाल्याला द्यावा.

पण कोळी म्हणे " तो कां ? मासे पकडले मीं; ते येथें आणले मीं, तुला अर्धा हिस्सा काय म्हणून ? " त्यावर देवडीवाल्यानें एकदम म्हटलें, " बस्, जास्त बडबड करू नको. एकदां सांगितलें, तें झालें. अर्धा हिस्सा देणार असशील तर आंत जा, नाहींतर चालता हो. "

कोळ्यानें क्षणमात्र विचार केला. नंतर त्यानें ' हो ' म्हटलें आणि आंत प्रवेश मिळवला. त्याला सरदाराकडे नेण्यांत आलें. मासे पाहून सरदाराचा आनंद गगनांत मावेना ! तो खूष होऊन म्हणाला, " या माशांची किंमत म्हणून तुला काय वाटेल तें मागून घे. "

कोळी म्हणाला, "हुजूर, उंटाच्या चामड्याच्या नऊपदरी चाबकानें माझ्या पाठीवर शंभर फटके मारा. हेंच माझें बक्षिस."

"वेड तर नाहीं लागलें तुला ! पैसा माग, घर माग, तुझ्या उपयोगाची एखादी वस्तू माग; ही काय भलतीच मागणी !"

"नको हुजूर, मला दुसरें कांहीं नको. मला फटकेच पाहिजेत."

सरदाराला कांहीं बोध होईना. पण त्याला मासे तर हवेच होते. म्हणून त्यानें त्याची अट कबूल केली आणि शिक्षा देणाऱ्या अधिकाऱ्याला बोलावून त्याला शंभर फटके मारण्याची आज्ञा दिली. 'पण हळूं मार हो' अशी प्रेमळ सूचना मुद्दाम देण्यास मात्र तो विसरला नाहीं.

एक, दोन, तीन........पन्नास झाल्याबरोबर कोळी ओरडला, "थांबा, थांबा. या धंद्यांत माझा एक भागीदार आहे. बाकीची किंमत त्याला द्यावयाची आहे."

आतां तर सर्व लोक आश्चर्यात पडले, सरदार म्हणाला, "काय ? तुझ्यासारखा मूर्ख आणखीही कोणी आहे काय ?"

"होय, हुजूर ! आणि तो म्हणजे आपल्या देवडीवरील पहारेकरी. प्रासीचा अर्धा वांटा दिल्याखेरीज तो मला आंत सोडीचना."

सरदाराला एका क्षणांत सर्व गोष्टींचा उलगडा झाला. "त्याला खेंचून घेऊन या" असा हुकूम देऊन तो येतांच "आतां सपाटून कोरडे ओढा" असें त्यानें खडसून बजावलें आणि मग कोळ्याला चांगलें बक्षिस दिलें.

प्रासीचा अर्धा वांटा देवडीवाल्याला मिळाला खरा पण त्याला हवा होता तसा मात्र नाहीं.

मुस्लिम लीगच्या वतीनें पन्नास टक्के मागणी वारंवार केली जात आहे. या मागणीला न्यायाचा पाठिंबा कोठेंही नाहीं. पण

धडधडीत अन्याय असूनही लीगला सध्यांच्या राजकारणांत जें स्थान मिळालें आहे त्यामुळें ती अशी मागणी करूं धजली आहे. कॉंग्रेसनें प्राप्तीचा अर्धा वाटा देण्याचें कबूल केल्यावांचून तिला आंत जाऊं द्यायला ती तयार नाहीं.

स्वातंत्र्यासाठीं चाललेल्या आपल्या प्रयत्नांबद्दल कॉंग्रेसला गेल्या ४० वर्षांत कित्येक वेळां बेकायदा ठरवण्यांत आलें, तिच्या कचेऱ्यांना टाळीं ठोकण्यांत आलीं. झडत्या, जप्त्या झाल्या, तुरुंगवास भोगावा लागला, इतकेंच नव्हे तर वैयक्तिक आकांक्षा, भवितव्य, स्वातंत्र्य आणि जीवन या सर्वांचा त्यागही तिला करावा लागला.

कॉंग्रेसच्या नांवाखालीं चाललेली प्रत्येक गोष्ट योग्यच असें म्हणतां येणार नाहीं; पण चालू असंतोष दूर ठेवला तर कॉंग्रेसनें देशभक्ति, स्वातंत्र्यप्रेम आणि वैयक्तिक त्याग यांचा आदर्श गेल्या २० वर्षांत आपल्या-पुढें ठेवला आहे ही गोष्ट कोणालाही नाकबूल करतां येणार नाहीं.

तिनें १०० फटक्यांचें बक्षिस मागितलें आहे. मग त्याचा अर्धा वांटा घ्यावयास मुस्लिम लीगनें तयारी दाखविली आहे काय ?

जात्यंधांनीं आपलें धोरण भलत्याच पायावर उभारलें आहे. स्वतः साम्राज्य सरकारच्या दरवाजावर बसून प्राप्तीचा अर्धा वांटा मागितला आहे.

लीगनें यापेक्षां अधिक विधायक धोरण स्वीकारावें. स्वातंत्र्या-साठीं खटपट करावी; देशाला परकीयांपासून वांचवण्याचा प्रयत्न करावा; मगच सत्तेतील अर्धा वांटा मागण्याचा तिला अधिकार प्राप्त होऊं शकेल.

नुसती दरवाजावरची जागा मिळाली म्हणजे अर्ध्या वांट्यावर हक्क पोंचूं शकत नाहीं.

---

# बैलाशीं स्पर्धा करणारी बेडकी

जुन्या गोष्टी नेहेमींच जुन्या रहात नाहींत, त्यांची पुनरावृत्ति फारच वेळां होते. एकदां, दोनदां, तीनदां...अनेक वेळां! म्हणूनच इंग्रजींत म्हण आहे—'इतिहासाची पुनरावृत्ति होते.'

फार फार दिवसांपूर्वींची गोष्ट आहे. एक होती बेडकी. तिचें एक लहानसें पिलू होतें. पाण्यांतल्या पाण्यांत आपल्याच लहानशा विहिरींत तें इकडून तिकडे फिरे.

एकदां त्या विहिरींतून कोणीं पाणी काढीत असतांना पाण्याच्या घागरींत बसून तें वर आलें. बाहेर पडल्यावर नवीन दुनिया पहाण्याचा त्याचा हा पहिलाच प्रसंग. या डबक्यांतून त्या डबक्यांत, त्यांतून तिसऱ्यांत, असें करीत करीत तें एका शेतांत पोचलें.

तिथें एक बैल उभा होता.

केवढा तरी प्रचंड असा तो प्राणी पाहून तें घाबरलें. इकडे तिकडे पांचपळ करूं लागलें. पण त्याला कांहींच कल्पना येईना. त्या प्राण्याच्या अजस्रपणाविषयीं आणि आकाराविषयीं कांहीं तरी खूप मोठें, प्रचंड, भव्य असें समजून तें पिलूं विहिरीकडे पळत सुटलें.

बराच वेळ भिरिभिरि भटकल्यावर त्याला विहीर सांपडली आणि तें एकदांचें घरीं पोंचलें.

आईनें विचारलें, "बाळ, तूं कोठें गेला होतास?"

आपल्या प्रवासाचें खूपच मनोरंजक आणि माहितीपूर्ण निवेदन केल्यानंतर तें पिलूं म्हणालें, "नि आई, तिथें किनई एक प्रचंड प्राणी होता. खूप खूप मोठा! तुझ्यापेक्षां सुद्धा मोठा!!"

हें शेवटलें वाक्य मात्र इतका वेळ मोठ्या कौतुकानें बाळाचें वर्णन ऐकत बसलेल्या बेडकीला सहन झालें नाहीं. तिनें विचारलें, "माझ्यापेक्षां?"

"हो. हो. तुझ्यापेक्षां!"

बेडकी रागावली. तिनें एक लांबलचक श्वास घेऊन आपलें पोट फुगवलें आणि म्हटलें, "एवढा?"

"नाहीं, आणखी मोठा."

खूपसा वारा पोटांत भरून घेत बेडकीनें पुनः विचारलें,

"एवढा?"

"अजून मोठा."

"एवढा?"

"अजून मोठा."

बेडकी पोट फुगवीत चालली आणि तिचें पोर त्याच्याहून मोठाच प्राणी पाहिला असें म्हणत राहिलें. शेवटीं तें म्हणालें, "आई, तूं आपलें पोट आणखी कितीही फुगवलेंस तरी त्याच्या तो प्राणी कितीतरी पट मोठा होता."

हा तिला सगळ्यांत मोठा धक्का बसला. न थांबतां भराभर श्वास घेण्यास तिनें सुरवात केली. आणि त्या प्राण्याइतकी मोठी झाल्यावर मगच मी थांबेन. मला कोण अडवणार आहे ! असा निश्चय केला.

पण ?—

ह्या निश्चयानंतर अवघ्या एकाच क्षणांत तिचें पोट फुटलें आणि साऱ्या शरीराच्या चिंधड्या उडाल्या.

हिंदी राजकीय प्रश्नांत मुस्लीम लीग पक्षाला प्रथम लहान स्थान होतें. पुढें तें थोडें वाढलें. फ्यूरर जीना तिचे कायदे आझम बनले. आपण वाटेल तेवढे मोठे होऊं शकूं, वाटेल त्याची बरोबरी करूं शकूं असें त्यांना वाटूं लागलें. खुद्द ब्रिटिशसरकारशीं पैज लावून त्यांनीं त्याला आव्हान दिलें.

" सरकारला पत्र लिहून काय उपयोग ! ते असे कोण मोठे लागून गेले आहेत. गांधीनीं मला पत्र लिहावें. येथलें सरकार कितीही × × आणि कसें × × असलें तरी मला आलेलें पत्र थांबविण्याची हिंमत त्यांच्या अंगांत नांहीं " असें त्याचें आव्हान होतें. आणि टाळ्यांचा प्रचंड गजर करून श्रोत्यांनीं त्याला आपली संमति असल्याचें दिग्दर्शित केलें होतें.

आपल्या हातांत एक गवताची काडी घेऊन तिलाच तलवार कल्पून जिनाशहांनीं पट्टयाचे वार फिरवण्यास सुरुवात केली. बेडकीचा आत्माभिमान जागृत झाला.

आपल्याला बैलाचा आकार यावा म्हणून बेडकीनें पोट फुगवण्यास प्रारंभ केला. बैलाला आव्हान दिलें.

हा बैल जर इसापाचा असता तर त्यानें बेडकीला तिच्या कृत्याचें

फळ भोगण्यास मोकळें ठेवलें असतें त्यासाठीं आपण खटपट केली नसती. पण आतांच्या बैलाला हें सहन झालें नाहीं.

म. गांधींनीं पत्र लिहिलें पण तें सरकारनें अडवलें एवढेंच नव्हे तर तसें जिनांना कळवलें आणि तें जाहीरही केलें.

बेडकीच्या हातांतली गवताची काडी बैलानें तिच्याच पोटांत टोंचली. त्याबरोबर रबरी फुग्यासारखें फुगलेलें तिचें पोट एका क्षणांत फट्कन् फुटलें.

फुकाच्या आव्हानापायीं बेडकीनें आपले अस्तित्व मात्र गमावलें !

---

# राजा !

लोकशाही जगांत कांहीं आतां एकदम आलेली नाहीं. लोक जगांत नसतांनाही जे प्राणी येथें होते त्यांनाही अशीच मनीषा होती.

बेडकांचा एक मोठा जमाव एका सरोवरांत बरेच दिवस मुक्काम करून राहिला होता. तें सरोवर त्यांचें पिढ्यानपिढ्यांचें घर होतें. अनिर्बंधपणें ते त्या सरोवरांत इतस्ततः विहार करीत.

सृष्टिकर्त्याचें सृष्टिनिर्मितिचें काम पुढें सुरूच होतें. पृथ्वीवर आणखी निरनिराळे प्राणी येऊं लागले. त्यांपैकीं कांहीं फावल्यावेळीं अकारण येऊन बेडकांना त्रास देत. हळूहळू उपद्रव वाढूं लागला तसतशी बेडकांना आपलें एकत्रित सामर्थ्य गोळा करण्याची जास्त जास्त आवश्यकता भासूं लागली.

पण हें काम सोपें नव्हतें; कोणातरी एका आदिशक्तीपुढेंच सर्व-जण नम्र होतील असें त्यांना वाटलें म्हणून त्यांनीं ईश्वराची प्रार्थना केली. भक्तिभावानें ईश्वराला आळवल्यावर ईश्वर प्रसन्न होतोच होतो मग तो बेडकांवर प्रसन्न झाला यांत काय नवल ! त्यानें काय हवें तें मागून घेण्यास सांगितलें.

बेडूक म्हणाले, "आम्हांला एक राजा दे. त्या राजाच्या नेतृत्वाखालीं राहून आमच्यावर येणारीं संकटें आम्ही परतवून लावूं शकूं."

ईश्वरानें "तथास्तु" म्हटलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सरोवरांत एक मोठा लाकडाचा ओंडका पाण्यावर तरंगत असलेला बेडकांना दिसला. राजा आलेला पाहून त्यांना अत्यानंद झाला. परचक्रापासून आपलें संरक्षण हा राजा करील असा त्यांना विश्वास वाटला आणि ते निर्धास्तपणें काळ कंठूं लागले.

पण खरोखरच परचक्र आलें. तेव्हां मात्र त्या लांकडाच्या ओंडक्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. राजा असूननसून सारखाच. सर्व बेडकांचें सामर्थ्य युद्धकामीं उपयोगांत आणणें त्याला साधणार कसें ?

बेडूक हा धडा उशीरां शिकले. त्यांनीं पुनः ईश्वराची आराधना केली. ईश्वर प्रगट झाला तेव्हां ते म्हणाले, "हट्, हा कसला राजा ? याला चालतां, बोलतां कांहीं करतां येत नाहीं. त्याचा आम्हांला काय उपयोग ? सर्व शक्तिमान्, बलाढ्य आणि शूर असा सजीव राजा आम्हांला हवा."

ईश्वर म्हणाला, "तथास्तु."

त्यानें दुसरा राजा पाठवून दिला. तो सजीव, सर्वशक्तिमान्, बलाढ्य नि शूर असा पाण्यांतलाच एक क्रूर प्राणी बगळा होता. परचक्र येण्याच्या अगोदरच त्याला भूक लागली; तेव्हां आपल्या

क्षुधाशमनार्थ त्यानें एकएक बेडूक उपयोगांत आणला. सकाळच्या न्याहारीलाच १०।५ बेडूक लागले.

हा प्रकार पाहून तर बेडकांची पांचांवर धारण बसली. त्यांनीं पुनः परमेश्वराला आळवलें आणि "हाही राजा नको." असें निक्षून सांगितलें. आपलीं कारणेंही त्यांनीं त्याला ऐकविलीं.

तेव्हां परमेश्वर म्हणाला, "तुमचें चुकलें तें येथेंच. राजा मागून मिळणार नाहीं. आणि मिळाला तर तो तुमच्या उपयोगास पडणार नाहीं. राज्यपद हें तुमच्याचपैकीं कोणीतरी सुशोभित केलें पाहिजे तरच तुमची संघटना होऊं शकेल, ती मजबूत होऊं शकेल आणि परचक्राचें निवारण करूं शकेल !"

हिंदुस्थानाला सध्यां परचक्राची भीति आहे. यापूर्वीही कित्येक वेळीं अशी भीति उत्पन्न झाली होती. निरनिराळे राजे येऊन गेले. लांकडाचे ओंडे आले, भयंकर क्रूर प्राणीही आले, पण परचक्राची भीति अजून शिलकच आहे. आणि हिंदवासीयांना अद्याप परचक्राचें निवारण स्वसामर्थ्यानें करतां आलेंलें नाहीं.

राजा आपल्यापैकींच पाहिजे ही गोष्ट त्यांना आतां पूर्णपणें उमगली आहे आणि म्हणून तीच त्यांची एकमेव मागणी आहे.

---